**विधवा, परितक्त्या, घटस्फोटीत महिलांना स्वयंरोजगारक्षम कौशल्य विकास प्रशिक्षणाद्वारे स्वयंरोजगार उपलब्ध करून देण्याबाबतची योजना.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: कौविउ-२०१९/प्र.क्र.७२/अभियान-१,**
**दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**

**दिनांक : ४ डिसेंबर, २०१९**

**वाचा :** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक एईओ-१०१५/प्र.क्र.०६/ २०१५/दहा, दिनांक १५ जानेवारी, २०१५.
२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्रमांक कौविउ- २०१५/प्र.क्र.१९५/रोस्वरो-१, दिनांक ०३ ऑगस्ट, २०१५.
३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्रमांक कौविउ- २०१५/प्र.क्र.१२२/रोस्वरो-१, दिनांक ०२ सप्टेंबर, २०१५.

**प्रस्तावना :**

मा. वित्त मंत्री यांनी दिनांक १८ जून, २०१९ रोजी सन २०१९-२० या वर्षाचा राज्याचा अर्थसंकल्प सादर करताना "*विधवा, परितक्त्या, घटस्फोटीत महिला यांच्या आयुष्यातील आर्थिक ताण हा अनेकदा भीषण ठरतो. या महिलांना आधार देणे व स्वयंपूर्ण, स्वावलंबी बनविणे हे सामाजिक कर्तव्य ठरते. त्या दृष्टीने सदर महिलांकरिता निवडक क्षेत्रामध्ये कौशल्य प्रशिक्षण प्रदान करून स्वयंरोजगारक्षम बनविणे अशा महिलांमध्ये आत्मविश्वास निर्माण व्हावा आणि स्वत:च्या पायावर उभे राहण्याची क्षमता निर्माण होण्यासाठी या महिलांना स्वयंरोजगारक्षम कौशल्य विकास प्रशिक्षण देऊन स्वयंरोजगार उपलब्ध करून देण्याचा शासनाचा मानस आहे.*" अशी घोषणा केली आहे.

विधवा, परितक्त्या, घटस्फोटीत महिलांना स्वयंरोजगारासाठी सक्षम करण्याकरिता कौशल्य विकास प्रशिक्षणाबाबतची योजना प्रस्तावित करण्यात आली असून कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या दिनांक ०३/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक २६/०९/२०१९ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार सदर योजना राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विधवा, परितक्त्या, घटस्फोटीत महिला यांच्या आयुष्यातील आर्थिक ताण हा अनेकदा भीषण ठरतो. या महिलांना आधार देणे व स्वयंपूर्ण, स्वावलंबी बनविणे हे सामाजिक कर्तव्य ठरते. त्या दृष्टीने "**विधवा, परितक्त्या, घटस्फोटीत महिलांना स्वयंरोजगारक्षम कौशल्य विकास**

**प्रशिक्षणाद्वारे स्वयंरोजगार उपलब्ध करून देण्याबाबतची योजना**" राबविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**योजनेचा उद्देश**

- विधवा, परितक्त्या, घटस्फोटीत महिलांमध्ये आत्मविश्वास निर्माण व्हावा आणि स्वत:च्या पायावर उभे राहण्याची क्षमता निर्माण होण्यासाठी या महिलांना स्वयंरोजगारक्षम कौशल्य विकास प्रशिक्षण देऊन स्वयंरोजगार उपलब्ध करून देणे.
- अकुशल मनुष्यबळाला कौशल्यपूर्ण प्रशिक्षण (Skilling) देणे. तसेच सध्याच्या कुशल मनुष्यबळाला करिअरमध्ये प्रगतीच्या दृष्टीने कौशल्यवृद्धी (Upskilling) संदर्भातील प्रशिक्षण देणे.

**योजनेची अंमलबजावणी व संनियंत्रण**

रोजगाराबाबत बदलत्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिस्थिती कौशल्य विकास व उद्योजकता अधिक प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाच्या धर्तीवार राज्य शासनाने दि.१५/०१/२०१५ रोजी स्वतंत्र कौशल्य विकास व उद्योजकता विभागाची स्थापना केली आहे. कौशल्य विकास व उद्योजकता विभागाअंतर्गत महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीची संस्था नोंदणी अधिनियम, १८६० अंतर्गत दिनांक १५ फेब्रुवारी, २०११ रोजी नोंदणी करण्यात आली आहे.

केंद्र व राज्य शासनाच्या विविध कौशल्य विकास योजना राज्य शासनाच्या विविध विभागाकडून राबविण्यात येतात. परिणामी त्यात एकसूत्रता यावी तसेच कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विषयक राष्ट्रीय व राज्य पातळीवरील धोरणांचे सनियंत्रण, नियोजन व प्रभावी अंमलबजावणी व्हावी, या दृष्टीने राज्यात कौशल्य विकास संबंधित सर्व योजना महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी मार्फत राबविण्याचे निश्चित करण्यात आले आहे. सदर संस्था कौशल्य विकास योजनेकरिता "नोडल एजन्सी" म्हणून कार्यरत आहे. राज्याच्या कौशल्य व उद्योजकता विभागाने राज्यात कौशल्य विकास कार्यक्रम राबविण्यासाठी दिनांक ०२ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये "प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान (PMKUVA)" सुरु करण्यात आले आहे.

विधवा, परितक्त्या, घटस्फोटीत महिलांना स्वयंरोजगारासाठी सक्षम करण्याकरिता कौशल्य विकास प्रशिक्षणाची योजना महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी मार्फत राबविण्यात येणार आहे.

**योजनेचे लाभार्थी**

सदर योजनेंतर्गत लाभार्थी महिलांचे वर्गीकरण खालीलप्रमाणे राहील.

- विधवा - शहीद जवानांच्या पत्नी, आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या पत्नी आणि अन्य विधवा.
- घटस्फोटीत महिला
- परितक्त्या

सदर महिलांनी सक्षम प्राधिकरणामार्फत विधवा/परितक्त्या/घटस्फोटीत असण्याचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे अथवा कौशल्य विकास व उद्योजकता विभागामार्फत घेण्यात येणाऱ्या निर्णयाप्रमाणे उचित प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

**उमेदवारांची पात्रता व प्रवर्ग**

सदर योजनेंतर्गत लाभ घेणाऱ्या उमेदवारांची पात्रता व प्रवर्ग खालीलप्रमाणे आवश्यक राहील.

- वयोगट : १८ वर्षे ते ४५ वर्षे
- शैक्षणिक पात्रता : अभ्यासक्रमानुसार शैक्षणिक अर्हता धारण केलेली असणे आवश्यक.
- रहिवासी : उमेदवार हा महाराष्ट्र राज्यातील रहिवासी असावा.
- प्रवर्ग : विधवा/परितक्त्या/घटस्फोटीत महिला
- प्रस्तावित जिल्हे : महाराष्ट्रातील सर्व जिल्हे

**कौशल्य प्रशिक्षण (क्षेत्र आणि अभ्यासक्रम)**

सदर कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी रोजगार/स्वयंरोजगारक्षम प्रशिक्षण अभ्यासक्रमाची निवड करण्यात येणार आहे. सदर अभ्यासक्रम हे NCVT/SSC/MSCVT मान्यता प्राप्त मूल्यमापन व प्रमाणीकरण संस्थाद्वारे मान्य असणे बंधनकारक आहे.

**प्रशिक्षण संस्थांची निवड**

सदर योजनेकरिता प्रशिक्षण संस्थांची निवड खालील पद्धतीने करण्यात येईल.

- कौशल्य प्रशिक्षण संस्था ही NSQF complaint असावी त्यासोबत महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीकडे सूचीबद्ध असणे आवश्यक आहे. तसेच, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी अंतर्गत ज्या संस्था सूचीबद्ध नाही त्या प्रशिक्षण संस्थेकडे VTI Id किवा S.M.A.R.T (Skill Management and Accreditation of Training Centre) पोर्टलवर सूचीबद्धता प्राप्त असेल तर अशा संस्था MSSDS पोर्टलवर सूचीबद्ध करण्याची सुविधा उपलब्ध करून देण्यात येईल.

- महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीच्या वेबपोर्टलवर सूचीबद्ध कौशल्य प्रशिक्षण संस्थांकरिता वेगवेगळ्या प्रशिक्षण अभ्यासक्रमासाठी निश्चित करण्यात आलेले प्रशिक्षण खर्चाचे दर लागू राहतील.

- कौशल्य विकास प्रशिक्षण देण्यासाठी संबंधित संस्थेकडे कौशल्य प्रशिक्षण संस्थेच्या NSQF सुसंगत, आवश्यक पायाभूत सुविधा, पुरेसे मनुष्यबळ यांची क्षमता असणे आवश्यक राहील.

- प्रशिक्षण संस्थेने NSQF (National Skill Qualification Framework) शी सुसंगत आणि महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीच्या एकात्मिक वेबपोर्टलवर उपलब्ध असलेले कौशल्य विषयक अभ्यासक्रमांचे प्रशिक्षण कार्यक्रम राबविणे आवश्यक राहील.

- प्रशिक्षण संस्थेस राज्य आणि केंद्र शासनाच्या काळ्या यादीत टाकलेले नसावे.
- प्रशिक्षण संस्थेकडे पुरेशी जागा, स्वत:चा प्रशिक्षित प्रशिक्षक वर्ग तसेच प्रशिक्षणाकरिता आवश्यक साहित्य उपलब्ध असणे आवश्यक राहील.
- सदर योजनेकरिता लाभार्थ्याच्या उपस्थितीची नोंद घेण्याकरिता प्रशिक्षण संस्थेकडे बायोमॅट्रिक उपस्थिती प्रणालीची सोय असणे आवश्यक राहील.
- सादर संपूर्ण योजना हि Web-based पद्धतीने सनियंत्रण/मुल्यामापित केली जाईल.

**योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण**

योजनेंतर्गत शासनाच्या ध्येय धोरणांप्रमाणे कार्यक्रमाची रूपरेषा ठरविणे, अंमलबजावणीचे सनियंत्रण, नियमित आढावा घेणे, आवश्यकतेनुसार योजनेसंबंधी विविध प्रकारचे धोरणात्मक निर्णय घेणे. त्यानुसार आवश्यक ते बदल करणे, विविध प्रकारचे धोरणासंबंधी वेळोवेळी निर्णय घेणे व आवश्यकतेनुसार यामध्ये बदल करणे यासाठी अपर मुख्य सचिव कौशल्य विकास व उद्योजकता विभागातील यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यात येईल. या समितीमध्ये अपर मुख्य सचिव (कौशल्य विकास व उद्योजकता विभाग), सहसचिव (कौशल्य विकास व उद्योजकता विभाग), मुख्य कार्यकरी अधिकारी (महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी), उपसचिव (महिला व बालकल्याण विभाग), अवर सचिव(कौशल्य विकास व उद्योजकता विभाग) यांचा समावेश असेल.

सदर योजनेची राज्यस्तरीय अंमलबजावणी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी (MSSDS) व महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषद (MSCVT) यांच्यामार्फत तसेच जिल्हास्तरीय अंमलबजावणी संबंधित जिल्ह्यातील सहाय्यक संचालक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र यांचेमार्फत खालीलप्रमाणे करण्यात येणार आहे. याकरिता संबंधित विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या विविध कौशल्य विकास योजनांचा लाभ घेतलेल्या प्रशिक्षणार्थ्यांची माहिती संबंधित विभागांनी कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या वेब पोर्टलवर उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील.

a) **योजनेचा प्रचार व प्रसार -**

i) महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी योजनेचा प्रिंट, इलेक्ट्रॉनिक मिडिया तसेच सोशल मिडियाच्या माध्यमातून योजनेचा राज्यस्तरीय प्रचार व प्रसार करेल.

ii) प्रत्येक जिल्ह्याकरिता जिल्हा कौशल्य विकास कार्यकारी समितीमार्फत विशेष जनजागृती मोहीम राबविण्यात येईल.

iii) सदर योजनेचा प्रचार व प्रसार संबंधित विभागामार्फत देखील करण्यात येईल.

b) **लाभार्थ्यांची निवड व नोंदणी**

i) योजनेचा लाभ घेण्याकरिता इच्छुक विधवा/परितक्त्या/घटस्फोटीत महिलांनी ऑनलाइन पद्धतीने अर्ज करणे आवश्यक राहील. ऑनलाइन पद्धतीने अर्ज करतांना सूचीबद्ध प्रशिक्षण संस्थांमधून योग्य प्रशिक्षण संस्थेची निवड करण्याची मुभा संबंधित उमेदवारांस राहील.

ii) ऑनलाइन पद्धतीने प्राप्त झालेली विधवा/परितक्त्या/घटस्फोटीत महिलांची वैयक्तिक माहिती, शैक्षणिक अर्हता व इतर आवश्यक बाबींची पडताळणी संबंधित विभागामार्फत करण्यात येईल. सदर महिला विधवा/परितक्त्या/घटस्फोटीत असल्याची पडताळणी करण्याची जबाबदारी ही संबंधित विभागाची राहील. पडताळणीअंती पात्र महिलांची नोंदणी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीच्या संकेतस्थळावर करण्यात येईल.

iii) नोंदणी प्रक्रियेअंतर्गत संबंधित महिलांनी विधवा/परितक्त्या/घटस्फोटीत असल्याचे सक्षम प्राधिकरणाचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

**<u>प्रशिक्षणाची संरचना व प्रशिक्षण कार्यप्रणाली</u>**

सदर योजनेंतर्गत प्रशिक्षणाची संरचना व प्रशिक्षण कार्यप्रणाली खालीलप्रमाणे राहील.

- एखाद्या संस्थेत प्रशिक्षण तुकडी सुरु करण्याकरिता पर्याप्त प्रमाणात महिला उपलब्ध न झाल्यास तथापि, उपलब्ध महिलांचे प्रशिक्षण सुरु करण्यास संस्था इच्छूक असल्यास विशेष बाब म्हणून सदर प्रशिक्षण तुकडी सुरु करण्यास मान्यता देण्याचे अधिकार महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांना असतील.
- प्रशिक्षण संस्थेकडून प्रशिक्षणाकरिता एका तुकडी करिता प्रशिक्षणार्थ्यांची यादी अपलोड केल्यानंतर सदर तुकडीस Training Batch Number (TBN) MSSDS पोर्टलमार्फत देण्यात येईल.
- MSSDS पोर्टल मार्फत TBN प्राप्त झाल्यानंतर सात दिवसांच्या आत सबंधित प्रशिक्षण संस्थेने प्रशिक्षण कार्यक्रमाच्या वेळापत्रकाची सूचना देणे बंधनकारक राहील.
- प्रत्येक प्रशिक्षण संस्थेने प्रशिक्षणार्थी व प्रशिक्षक यांचा दैनंदिन बायोमेट्रिक उपस्थिती अहवाल महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीच्या पोर्टलमार्फत सबंधित सहभागधारकांना उपलब्ध करून देणे आवश्यक राहील.
- प्रशिक्षण संस्थानी प्रशिक्षण विहित कालावधीत पूर्ण करणे बंधनकारक राहील.
- जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागातील अधिकारी प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षण संस्थांना अचानक भेटी देऊन बायोमेट्रिक्स हजेरी व संबंधित अहवालाची पडताळणी करतील.
- महास्वयंम पोर्टलवर सूचीबद्ध असलेल्या प्रशिक्षण संस्थांची प्रक्रियेची कालबद्धता खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र | प्रक्रिया टप्पा | महत्तम कालावधी |
|---|---|---|
| १ | सुचीबध्द संस्थाना मंजुरी आदेश प्रदान करणे | T१ |
| २ | प्रशिक्षण तुकडी तयार करण्यासाठी वेळ उपलब्ध करुन देणे. | T२=T१+१८० दिवस |

| अ.क्र | प्रक्रिया टप्पा | महत्तम कालावधी |
|---|---|---|
| ३ | प्रशिक्षण तुकडी तयार केल्यानंतर बॅच फेज MSSDS पोर्टलवर (Ready to Start) केल्यानंतर MSSDS कडून TBN प्रदान करणे. | T३=T२+७ |
| ४ | प्रशिक्षण संस्थाकडून प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर बॅच फेज MSSDS पोर्टलवर (Ready For Assessment) केल्यानंतर बॅच चे मूल्यमापन करण्यासाठी संस्था नियुक्त करणे. | T४=T३+१५ |
| ५ | मुल्यमापन संस्था नियुक्त केल्यानंतर मुल्यमापन करुन निकाल घोषित करणे | T५=T४+१५ |
| ६ | निकाल घोषित केल्यानंतर प्रमाणपत्र प्रदान करणे | T६=T५+७ |
| ७ | वेगवेगळ्या टप्यातील प्रशिक्षण संस्थांची उमेदवारांच्या छाननी प्रक्रियेनंतर देयके सादर करणे. | प्रशिक्षण संस्थांनी देयके सादर केल्यास ३० दिवसाच्या आत देयके अदा करणे (निधीच्या उपलब्धतेनुसार) |

**मूल्यमापन व प्रमाणन**

प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर उमेदवारांची प्रशिक्षण वर्गातील किमान ७५% उपस्थिती असल्यास संबंधित उमेदवार मूल्यमापन करण्याकरिता पात्र राहील. मूल्यमापनाअंती यशस्वी उमेदवारांना त्यांनी निवड केलेल्या अभ्यासक्रमानुसार SSC/MSCVT यांचे मार्फत प्रमाणपत्र प्रदान करण्यात येईल.

**प्रशिक्षण खर्च प्रतिपूर्ती**

प्रशिक्षणार्थ्यांची प्रशिक्षण वर्गातील किमान ७५% उपस्थिती विचारात घेऊन प्रशिक्षण संस्थाना खालीलप्रमाणे प्रशिक्षण खर्चाची प्रतिपूर्ती करण्यात येईल.

| टप्पा | टक्केवारी | निकष | शेरा |
|---|---|---|---|
| पहिला | ३०% | प्रशिक्षण संस्थेने प्रशिक्षण तुकडी सुरु केल्यानंतर | ३०% प्रशिक्षण शुल्क संबंधित महिला उमेदवारांनी भरणे आवश्यक राहिल. |
| दुसरा | ३०% | उमेदवारांच्या कौशल्याचे मुल्यांकन (assessment) व प्रमाणन (certification) तसेच बायोमेट्रिक हजेरी प्रणालीतील उपस्थिती | उमेदवारांच्या कौशल्याचे मुल्यांकन (assessment) व प्रमाणन (certification) झाल्यानंतर ३०% रक्कम संबंधित प्रशिक्षण संस्थाना अदा करण्यात येईल. |
| तिसरा | २०% | प्रशिक्षणार्थ्यास रोजगार/ स्वयंरोजगार प्राप्त झाल्यापासून ३ | प्रशिक्षणार्थ्यास रोजगार मिळाल्या-बाबतचे रुजू पत्र, मानधनाचा दाखला, उमेदवाराचे नाव व ID व बँक खात्याचे |

| टप्पा | टक्केवारी | निकष | शेरा |
|---|---|---|---|
| | | महिन्याच्या कालावधीनंतर | मागील ३ महिन्याचे स्टेटमेंट व जर प्रशिक्षणार्थ्यांने स्वयंरोजगार सुरु केला असेल तर व्यवसाय सुरु दिनांक, नोंदणी क्रमांक, व्यवसाय/स्वयंरोजगाराचे स्वरूप/प्रकार, मागील ३ महिन्यांचे सरासरी उत्पन्न, इ.माहितीचा तपशील सादर केल्यानंतर २०% रक्कम संबंधित प्रशिक्षण संस्थाना अदा करण्यात येईल |
| चौथा | २०% | प्रशिक्षणार्थ्यास रोजगार/ स्वयंरोजगार प्राप्त झाल्यापासून ६ महिन्याच्या कालावधीनंतर | प्रशिक्षणार्थ्यास रोजगार मिळाल्या-बाबतचे रुजू पत्र, मानधनाचा दाखला, उमेदवाराचे नाव व ID व बँक खात्याचे मागील ६ महिन्याचे स्टेटमेंट व जर प्रशिक्षणार्थ्याने स्वयंरोजगार सुरु केला असेल तर व्यवसाय सुरु दिनांक, नोंदणी क्रमांक, व्यवसाय/स्वयंरोजगाराचे स्वरूप/प्रकार, मागील ६ महिन्यांचे सरासरी उत्पन्न, माहितीचा तपशील सादर केल्यानंतर २०% रक्कम संबंधित प्रशिक्षण संस्थाना अदा करण्यात येईल |

**टिप** :

- पहिल्या टप्प्यातील ३०% प्रशिक्षण शुल्क हे संबंधित महिला उमेदवारांनी अदा करणे आवश्यक राहील.
- प्रशिक्षण संस्थांना अदा करावयाच्या ७०% प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती ही महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीकडील Skill Wallet या योजनेतून अथवा Direct Benefit Transfer (DBT) द्वारे करण्यात येईल.
- या योजनेकरिता उपलब्ध होणारा निधी महिला विधवा/परितक्त्या/घटस्फोटीत महिलांची नोंदणी विचारात घेऊन जिल्हानिहाय विभागून देण्यात येईल. आदिवासी/सामाजिकदृष्टया मागास घटकातील महिला असल्यास सदर महिलांच्या ७०% प्रशिक्षण शुल्काची रक्कम संबंधित विभाग/महिला व बालकल्याण विभागाने अदा करावी.
- प्रशिक्षण शुल्काच्या ७०% रक्कम अदायगी ही कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रुपये ८ लाख पेक्षा कमी असलेल्या विधवा/परितक्त्या/घटस्फोटीत महिलांसाठीच लागू राहिल. कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रुपये ८ लाख पेक्षा जास्त असल्यास प्रशिक्षण शुल्काची १००% रक्कम विधवा/परितक्त्या/ घटस्फोटीत महिलांनी संबंधित संस्थेस अदा करणे आवश्यक राहील.

## योजनेच्या अंमलबजावणीची जबाबदारी

सदर योजनेच्या अंमलबजावणीची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील.

a) **महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी**
योजनेचे “web based” नियोजन, अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याची सुविधा सर्व सहभागधारकांना उपलब्ध करून देणे, निधीचा योग्य पद्धतीने विनियोग होत असल्याची खातरजमा करणे व त्याबाबतचे निधी वापर प्रमाणपत्र विहित कालमर्यादेत कौशल्य विकास व उद्योजकता विभागास सादर करणे, योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण प्रभावीपणे व योग्य पद्धतीने होत असल्याची खातरजमा करणे तसेच क्षेत्रीय स्तरावर काम करणाऱ्या विविध घटकांमध्ये प्रभावी समन्वय साधून योजनेची सुरळीतपणे अंमलबजावणी करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीची राहील.

b) **महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषद**
प्रशिक्षण संस्थांना VTI उपलब्ध करून देण, प्रशिक्षणार्थ्यांच्या कौशल्याचे मूल्यमापन करणे व यशस्वीरीत्या प्रशिक्षण पूर्ण करणाऱ्या प्रशिक्षणार्थ्यांना प्रमाणपत्र प्रदान करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषदेची राहील.

c) **जिल्हा कौशल्य कार्यकारी समिती**
जिल्हा स्तरावर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करणे, योजनेचा लाभ घेण्याकरिता लाभार्थ्यांना प्रोत्साहित करणे व mobilize करणे, जिल्ह्यातील सेवा आणि औद्योगिक क्षेत्रातील आस्थापना संसाधन उपलब्ध करून देऊन कुशल मनुष्यबळास रोजगार उपलब्ध करून देण्यासाठी प्रोत्साहित करणे, योजनेचे उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने नाविन्यपूर्ण कल्पना सुचविणे व त्यानुसार प्रस्ताव शासनास सादर करणे तसेच जिल्हा स्तरावरील अधिकाऱ्यांचा योजनेचे नियोजन अंमलबजावणी व सनियंत्रणाच्या प्रक्रियेत सक्रिय सहभाग असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी जिल्हा कौशल्य कार्यकारी समितीची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९१२०४१५२७२४३६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2019.12.04 15:31:25 +05'30'

( संतोष रोकडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

४. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
७. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, मुंबई
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
११. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. निवड नस्ती. (अभियान-१)